**सहायक अभियंता श्रेणी-१/ उप विभागीय अभियंता/ उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) यांची बदलीने नियुक्ती/ पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०२३/प्र.क्र.१९९/सेवा-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२.**
**दिनांक:-१५ मार्च,२०२४.**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सार्वजनिक बांधकाम विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१/ उप विभागीय अभियंता/उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) संवर्गातील अभियंत्यांची त्यांच्या विनंतीनुसार खाली दर्शविल्याप्रमाणे बदलीने नियुक्ती/पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अभियंत्यांचे नाव व पदनाम | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | बदलीने नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.प्रफुल हरिभाऊ झाडे, उप विभागीय अभियंता. | उप अभियंता, जागतिक बँक प्रकल्प उपविभाग क्र.१, नागपूर | उप अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम) उप विभाग, तुमसर, जि.भंडारा या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी.(विनंतीनुसार) |
| २. | श्री.मुकुंद गोविंदराव कचरे, उप विभागीय अभियंता. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, आर्णी. | उप अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम) उपविभाग, महागाव या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| ३. | श्री.महेश हरिभाऊ मोकलकर, उप विभागीय अभियंता | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, आष्टी, जि.वर्धा. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, वर्धा या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |
| ४. | श्री.प्रकाश रामदास परळीकर, उप विभागीय अभियंता. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, नेर, ता.नेर, जि.यवतमाळ. | उप अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, यवतमाळ, जि.यवतमाळ या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| ५. | श्री.रोहित नागभूषण राव, सहा.कार्यकारी अभियंता | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग कार्यालय, नांदेड. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, मंगळवेढा, जि.सोलापूर या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| ६. | श्री.सतिश वामनराव सुपले, उप विभागीय अभियंता. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चाळीसगांव जि.जळगांव. | उप अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम) उप विभाग, देवळी, जि.वर्धा या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |

| अ.क्र | अभियंत्यांचे नाव व पदनाम | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | बदलीने नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| ७. | श्री.अनिल ना. बैसाणे, उप विभागीय अधिकारी | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उप विभाग, औरंगाबाद. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, चाळीसगांव, जि.जळगांव. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार श्री.सुपले यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी (विनंतीनुसार) |
| ८. | श्री.किशोर देविदास राव, उप विभागीय अधिकारी | उप कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उदगीर. | उप कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, धुळे या पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| ९. | श्री.सुनिल लक्ष्मीकांत मोरलवार, उप विभागीय अभियंता. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग पूर्णा, जि.परभणी. | उप अभियंता, राष्ट्रीय महामार्ग उपविभाग, मानवत, जि. नांदेड या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| १०. | श्री. संजय दत्तात्रय खोत, उप विभागीय अभियंता. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, दहिवडी, जि.सातारा. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, वडूज, जि.सातारा. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार श्री.पवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी (विनंतीनुसार) |
| ११. | श्री.राजेंद्र काशीनाथ पवार, उप विभागीय अधिकारी | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, वडूज, जि.सातारा. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, दहिवडी, जि.सातारा. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार श्री.खोत यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी (विनंतीनुसार) |
| १२. | श्री. संतोषकुमार दिलीप कामत, उप विभागीय अभियंता | उप कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम) विभाग, सांगली. | उप अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, सांगली या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| १३. | श्री.शिवकुमार शंकर कुपल, उप विभागीय अभियंता | उप अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम उपविभाग, इंदापूर, जि.पुणे. | उप अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम उपविभाग, बारामती, जि.पुणे या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| १४. | श्री.ओमप्रकाश आ. पाटील, उप विभागीय अधिकारी | पदस्थापनेविना | उप अभियंता, एकात्मिकृत घटक (सा.बां.) उप विभाग क्र.४, मुंबई या रिक्त पदी. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी (विनंतीनुसार) |

**२.** संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अभियंत्यास / अधिकाऱ्यांस आपल्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर करून घ्यावे. तसेच, संबंधीत अभियंत्यांस कोणत्या

दिनांकास कार्यमुक्त करण्यात आले व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser2.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडी त्वरित कळवावे.

**३.** वरील अभियंत्यांच्या विनंतीनुसार बदली असल्याने, त्यांना प्रवास भत्ता व पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

**४.** संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर आदेशान्वये बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या ज्या उप अभियंत्यांना सार्वत्रिक निवडणूक-२०२४ करीता कर्तव्यार्थ नियुक्ती करण्यात आली आहे. त्यांच्या बाबतीत निवडणूक कर्तव्यात बाधा येणार नाही याची दक्षता संबंधित उप अभियंता व नियंत्रण अधिकाऱ्यांने घ्यावी.

**५.** संबंधित अभियंत्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

**६.** सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२०२५२९२७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.03.15 20:34:38 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
२. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा.बां.), मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स.(सा.बां.वि.)/सचिव(रस्ते)/सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सा.बां.वि.मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर/अमरावती/औरंगाबाद/नांदेड/नाशिक/पुणे/ मुंबई/ कोकण.
५. मुख्य अभियंता, प्रधान मंत्री ग्राम सडक योजना, पुणे.

६. मुख्य अभियंता (रा.म.), सा.बां.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
७. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
८. सर्व संबंधीत अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ.
९. सर्व संबंधीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१०. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
११. संबंधीत अधिकारी (ई-मेल द्वारे).
१२. कार्यासन बांधकाम-१, ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन सेवा-२, संग्रहार्थ.